**आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांच्या आरोग्याबाबत घ्यावयाची दक्षता व त्या अनुषंगाने संबंधित अधिकाऱ्यांनी आश्रमशाळांना भेटी देऊन करावयाची तपासणी याबाबत मार्गदर्शक सूचना.**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः अआशा-२०२०/ प्र.क्र.१७/ का.११**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १२ मार्च, २०२०

**प्रस्तावना :**

आदिवासी भागातील बालमृत्यु टाळण्यासाठी मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या गाभा समितीची बैठक दिनांक १७.१२.२०१९ रोजी पार पडली. सदर बैठकीमध्ये खाजगी आश्रमशाळांमध्ये मुलांच्या तपासणीची अवस्था दयनीय असणे. कुठलाही अधिकारी येथे भेट न देणे व D.Ed पदवीका प्राप्त चित्रकला शिक्षक उपलब्ध नसणे या विषयाबाबत समितीने दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांच्या आरोग्याबाबत घ्यावयाची दक्षता व इतर अनुषंगिक बाबींसंदर्भात करावयाची कार्यवाही याबाबत सर्व संबंधित अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**परिपत्रक :**

शासनाच्या दिनांक ८ मार्च, २०१९ च्या शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या शासकीय आश्रमशाळा व स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांसाठी आश्रमशाळा संहिता लागू करण्यात आली आहे. सदर आश्रमशाळा संहितेमधील प्रकरण क्र.२.२ मध्ये विद्यार्थ्यांचे आरोग्य, आहार, पाणी व स्वच्छता याबाबत मार्गदर्शक मुद्दे नमूद करण्यात आले असून सदर मुद्दयांची अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. त्यापैकी खालीलप्रमाणे काही महत्वाचे मुद्दे हे विद्यार्थ्यांच्या आरोग्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचे असून त्याची अंमलबजावणी सर्व शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये करण्यात यावी.

१) आश्रमशाळेमध्ये शुध्द व स्वच्छ पाण्याची उपलब्धता आणि स्वच्छता असणे आवश्यक आहे.

२) अशक्त मूल तसेच जेवण कमी होणे, झोप वाढणे, हालचाली मंदावणे, स्फुर्ती कमी होणे अशासारख्या आजारपणाची लक्षणे असलेल्या विद्यार्थ्यांवर शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्याकडून विशेष काळजी घेण्यात यावी.

३) सर्व विद्यार्थ्यांना टिटॅनस टॉक्साईड डोस (१० व्या वर्षी व १६ व्या वर्षी), डीपीटी बुस्टर डोस (५-६ वर्ष वयोगटासाठी) व एमएमआर लसीकरण तसेच अन्य डोस/लसीकरण वेळापत्रकानुसार देण्यात याव्यात.

४) विद्यार्थ्यांना दर सहा महिन्यातून जंत प्रतिबंधक औषधे डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार देण्यात यावीत.

५) विद्यार्थ्यांना लोह व फॉलिक ॲसिडच्या गोळ्या दर आठवड्याला देण्यात याव्यात.

६) आश्रमशाळेच्या परिसरामध्ये डास, किटक, झुरळे व उंदीर इ. यांच्यावर प्रतिबंध ठेवण्यासाठी आवश्यक उपाय करण्यात यावेत. तसेच वर्षातून एकदा सुट्टीच्या काळात पेस्ट कंट्रोल करुन घ्यावे.

७) आश्रमशाळेच्या परिसरात किंवा आजूबाजूला अनारोग्यकारक किंवा हानिकारक अन्न, पेय किंवा खाद्यपदार्थ यांची विक्री करण्यास सक्त मनाई करण्यात यावी.

८) आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना दररोजच्या आहारात सकाळचा नाश्ता, दुपारचे जेवण, दुपारचा नाश्ता व संध्याकाळचे जेवण याचा समावेश असणे आवश्यक आहे. तसेच सदर आहार सकस व पुरेसा असावा.

९) आश्रमशाळेमधील सकाळच्या जेवणाची नमुना थाळी सायंकाळचे जेवण तयार होईपर्यंत व सायंकाळच्या जेवणाची नमुना थाळी सकाळचे जेवण तयार होईपर्यंत ठेवणे बंधनकारक आहे.

१०) आश्रमशाळेतील आहाराची गुणवत्ता टिकवण्यासाठी आरोग्य व पोषण समिती स्थापन करावी.

११) विद्यार्थ्यांना वैयक्तिक व परिसर स्वच्छता, संतुलित आहार आणि शरीररचना, त्यातील विविध कार्यसंस्था जसे श्वसनसंस्था, पचनसंस्था इ. विषयी शिक्षण देण्यात यावे.

१२) आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांच्या आजाराचे वेळेवर निदान व उपचार होण्यासाठी प्राथमिक उपचारावर जास्त भर देण्यात यावा.

१३) दर सहा महिन्यांनी वजन व उंची परस्पर प्रमाण (बॉडी मास इंडेक्स) व हिमोग्लोबिनचे प्रमाण तपासून ते कमी असल्यास योग्य ते उपचार ताबडतोब करावे.

१४) विद्यार्थ्यांना कोणत्याही वेळी त्रास झाला तर आश्रमशाळेशी संबंधित ANM ला तात्काळ बोलावण्यात यावे. तसेच आजार गंभीर स्वरुपाचा असल्यास विद्यार्थ्याला जबाबदार शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्याकरवी त्वरित नजिकच्या सरकारी दवाखान्यात नेण्याची व्यवस्था करावी.

१५) आरोग्य उपकेंद्राने ए.एन.एम. च्या माध्यमातून आठवड्यातून दोनदा नियमित आश्रमशाळेला भेट द्यावी व गरजेनुसार उपचार करावे.

१६) शाळेत प्रवेश घेण्याऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याची पहिल्या ३० दिवसांमध्ये प्राथमिक आरोग्य केंद्रात किंवा अन्य उपलब्ध सुविधेद्वारे आरोग्य तपासणी करण्यात यावी. तसेच प्रत्येक विद्यार्थ्याचे आरोग्य प्रगती पत्रक बनविण्यात यावे. त्यामध्ये प्रत्येक तपासणीची नोंद अद्यावत करण्यात यावी.

१७) वर्षाच्या सुरुवातीला डिजीटल आरोग्य कार्ड भरुन घेणे ही वर्गशिक्षकाची जबाबदारी राहील. त्यानंतर प्रत्येक तपासणीच्या वेळी ते अद्यावत करण्यात यावे.

१८) ज्या प्राथमिक आरोग्य केंद्रांतर्गत आश्रमशाळा आहेत त्या प्राथमिक आरोग्य केंद्रांना अधिक्षकांनी वर्षाच्या सुरुवातीला विद्यार्थ्यांची संख्या कळवावी. जेणेकरुन विद्यार्थ्यांच्या प्रमाणात प्राथमिक आरोग्य केंद्रांना पुरेशी औषधे उपलब्ध करता येतील.

१९) वैद्यकीय आपत्कालीन परिस्थिती हाताळण्याचे प्रशिक्षण आश्रमशाळेतील अधिक्षक/अधिक्षिका व इतर अधिकारी-कर्मचाऱ्यांना देण्यात यावे.

२०) प्राथमिक आरोग्य केंद्र अथवा ग्रामीण रुग्णालय येथे आवश्यक आरोग्य सुविधा उपलब्ध नसल्यास त्वरीत खाजगी रुग्णालयात उपचार सुरु करावेत.

२१) आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांची Sickle Test करुन त्या विद्यार्थ्यांवर विशेष उपचार करावेत व काळजी घेण्यात यावी.

२. उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत संबंधित स्वयंसेवी संस्थांना निर्देश देण्यात यावेत. तसेच सदर निर्देशाची अंमलबजावणी करण्यात येते किंवा कसे याची तपासणी नियमित आश्रमशाळा भेटीच्या वेळी संबंधित अधिकाऱ्यांनी करावी. तसेच त्याबाबतची नोंद अहवालामध्ये घेण्यात यावी. तसेच प्रकल्प अधिकारी यांनी संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी अथवा त्यांचे प्रतिनिधी यांचेशी मासिक आढावा बैठक घेऊन या मार्गदर्शक सूचनांची कशा प्रकारे अंमलबजावणी होत आहे याबाबतचा अहवाल अपर आयुक्त यांना सादर करावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२००३१२१५५३२२५७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab548
59eae7920c9d0d1f622,
serialNumber=e5bb5862d0e131a274d92f7a1acef953e01301c1
b0fb615dc6cce4812bded257, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2020.03.12 15:55:13 +05'30'

(सु.ना.शिंदे)
उपसचिव महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

६. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. सर्व सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
१०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
११. सर्व संस्थाचालक (संबंधित प्रकल्प अधिकारी यांचेमार्फत)
१२. कक्ष अधिकारी (का-८) व (का-१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती (का.११) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.